20100517193854001

<u>अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१०-२०११ कोषागारातून देय अनुदान</u>

३६०४, स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे -२००- इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या अभिहस्तांकित रकमा देणे. (०१)(०११) जकात कराऐवजी ग्रामपंचायतींना नुकसान भरपाई अनुदान (३६०४०५३२), मागणी क्र. एल ५

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम २६१०/प्र.क्र. ८६ /पंरा-४
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक - ३० एप्रिल, २०१०

<u>प्रस्तावना :-</u>

राज्य मंत्रिमंडळाच्या निर्णयानुसार राज्यातील ग्रामपंचायतींची त्यांच्या हद्दीतील जकात कराची वसुली दिनांक ५ जुलै १९९९ पासून पूर्णपणे बंद करण्यात आलेली आहे. तसेच सदर निर्णयाप्रमाणे जकात कराची वसुली बंद झाल्यामुळे ग्राम पंचायतीच्या उत्पन्नात संभावित तूट व त्यामुळे ग्रामपंचायतीच्या प्रशासनावर व विकास कामावर विपरीत परिणाम होऊ नये म्हणून संबंधित ग्रामपंचायतींना ५ वर्षापर्यंत अनुदान देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. ही मुदत सन २००३-२००४ मध्ये संपुष्टात आली आहे. तथापि, याबाबत पुढील निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन असून हे अनुदान सन २०१०-२०११ पर्यंत तात्पुरत्या स्वरुपात पुढे चालू ठेवण्यात येत आहे.

<u>शासन निर्णय :-</u>

जकात कराऐवजी ग्रामपंचायतींना नुकसान भरपाई अनुदान (३६०४ ०५३२) या अनुदानाकरिता सन २०१०-२०११ या वर्षाकरिता रुपये १२,०७,०६,०००/- (रुपये बारा कोटी सात लक्ष सहा हजार फक्त ) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यांत आली आहे.

२. यास्तव आता या शासन निर्णयान्वये सन २०१०-२०११ या वर्षाकरीता जकात कराऐवजी ग्रामपंचायतींना नुकसान भरपाई अनुदान (३६०४०५२३२) देण्याकरीता रुपये २,२१,३०,०००/- (रुपये दोन कोटी एकवीस लक्ष तीस हजार फक्त) या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांना बी.डी.एस मार्फत अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हा परिषदाच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांना आहरण संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांनी त्यांच्या जिल्हयातील संबंधित ग्रामपंचायतींना वितरण करावयाच्या रकमा कोषागारातून काढून त्या धनादेशाद्वारे संबंधित ग्रामपंचायतींना प्रदान करण्याची व्यवस्था करावयाची आहे.

४. सदर वितरीत करण्यात आलेले अनुदान हे जकात कराची वसुली केल्यामुळे भरपाई पोटी देण्यात आलेले अनुदान असल्यामुळे या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची आवश्यकता असणार नाही.

५ या अनुदानाच्या वितरणाबाबतचा खर्च मागणी क्र. एल ५, "३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २०० - इतर संकिर्ण नुकसान भरपाईच्या अभिहस्तांकित रकमा देणे (०१) (११) जकात कराऐवजी ग्राम पंचायतींना नुकसान भरपाई अनुदान (३६०४०५३२) या लेखाशिर्षाखाली सन २०१० - २०११ या वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून खर्ची घालण्यात यावा. तसेच या वितरीत अनुदानाचा खर्चमेळ विषयक कार्यवाही संबंधित जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पूर्ण करुन खर्चाची विवरणपत्रे विभागीय आयुक्तांना पाठवावीत. विभागीय आयुक्तांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापालांकडे नोंदलेल्या खर्चाशी मेळ घालावा व अहवाल शासनाकडे पाठवावा. तसेच त्यांच्या जिल्हयातील ग्रामपंचायत निहाय वितरीत केलेल्या आदेशाच्या प्रती शासनाकडे पाठवाव्यात.

६. जिल्हा परिषदांनी वितरीत निधीचा खर्चाचा तपशील ३० जून, २०१० पर्यंत शासनास पाठवावा.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक वित्त विभाग क्र. अंदाज २०.१०/सीआर/६५/ अर्थसंकल्प - ३, दि. ०३.०४.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(signature)

( डॉ. प्रशांत रसाळ )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१ महालेखापाल (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र - १, मुंबई (५ प्रती )
२ महालेखापाल (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र - २, नागपूर ( ५ प्रती )
३ विभागीय आयुक्त, कोकण , नाशिक , पुणे , औरंगाबाद व नागपूर
४ जिल्हाधिकारी, ठाणे, रायगड, नाशिक, अहमदनगर, धुळे , नंदुरबार , जळगाव, पुणे,सातारा, सोलापूर, लातूर व नागपूर
५ मुख्य कार्यकारी अधिकारी , ठाणे, रायगड, नाशिक, अहमदनगर, धुळे, नंदुरबार , जळगाव, पुणे ,सातारा, सोलापूर , लातूर व नागपूर
६ जिल्हा कोषागार अधिकारी ठाणे, रायगड, नाशिक, अहमदनगर, धुळे, नंदुरबार, जळगाव, पुणे ,सातारा, सोलापूर , लातूर व नागपूर
७ मुख्य लेखा व वित्त अधिकारी ठाणे, रायगड, नाशिक, अहमदनगर, धुळे, नंदुरबार , जळगाव,पुणे ,सातारा, सोलापूर , लातूर व नागपूर
८ उप मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे, रायगड , नाशिक , अहमदनगर , धुळे , नंदुरबार , जळगाव, पुणे ,सातारा, सोलापूर , लातूर व नागपूर
९ अध्यक्ष, जिल्हा परिषद , ठाणे, रायगड , नाशिक , अहमदनगर , धुळे , नंदुरबार , जळगाव, पुणे ,सातारा, सोलापूर , लातूर व नागपूर मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्यामार्फत.
१० सरपंच व ग्रामसेवक (संबधित ग्रामपंचायती) (संबधित जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे मार्फत) त्यांना विनंती करण्यात येते की, हा शासन निर्णय तत्काळ त्यांच्या जिल्हयातील संबंधित ग्रामपंचातयीच्या निदर्शनास आणण्यात यावा. तसेच सदर अनुदान तत्काळ संबंधित ग्रामपंचायतीना देण्याची व्यवस्था करावी.
११ संचालक , लेखा व कोषागरे नवीन प्रशासन भवन , मुंबई
१२ उपमुख्य लेखा परिक्षक , स्थानिक निधी लेखा, मुंबई , पुणे , नाशिक , औरंगाबाद व नागपूर
१३ वित्त विभाग अर्थसंकल्प १६/व्यय १५ /अर्थोपाय
१४ कार्यासन क्र. वित्त१,वित्त७, वित्त८ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१५ निवड नस्ती (का.क्र.पंरा-४) ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय क्र. व्हीपीएम २६१० /प्र.क्र.८६/पंरा-४, दिनांक ३० एप्रिल, २०१० चे

सहपत्र विवरणपत्र

(रुपये लाखात)

| अ.क्र. | जिल्हा | २०१० - २०११ या वर्षासाठी देय एकूण अनुदान (रुपये) | एप्रिल, २०१० ते मे, २०१० साठी या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली रक्कम अक्षरी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | १.३३ | (रुपये एक लक्ष तेहतीस हजार फक्त ) |
| २ | रायगड | ४६.५४ | (रुपये शेहचाळीस लक्ष चौपन्न हजार फक्त ) |
| ३ | नाशिक | १६.२६ | (रुपये सोळा लक्ष सव्वीस हजार फक्त ) |
| ४ | अहमदनगर | १९.७४ | (रुपये एकोणीस लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त ) |
| ५ | धुळे | ३.३९ | (रुपये तीन लक्ष एकोणचाळीस हजार फक्त ) |
| ६ | नंदुरबार | ३.०५ | (रुपये तीन लक्ष पाच हजार फक्त ) |
| ७ | जळगांव | २२.२५ | (रुपये बावीस लक्ष पंचवीस हजार फक्त ) |
| ८ | पुणे | ३.२६ | (रुपये तीन लक्ष सव्वीस हजार फक्त ) |
| ९ | सातारा | ३८.०६ | (रुपये अठतीस लक्ष सहा हजार फक्त ) |
| १० | सोलापूर | ४५.२२ | (रुपये पंचेचाळीस लक्ष बावीस हजार फक्त ) |
| ११ | लातूर | ४.४६ | (रुपये चार लक्ष शेहचाळीस हजार फक्त ) |
| १२ | नागपूर | १७.७४ | (रुपये सतरा लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त ) |
| | एकूण | २२१.३० | (रुपये दोन कोटी एकवीस लक्ष तीस हजार फक्त) |

( डॉ. प्रशांत रसाळ )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

-------